धोके सौम्यीकरण प्रकल्पांतर्गत मंजूर कामे पुर्ण करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**

**शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६ (भाग-१) /आव्यप्र-१**

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक :- २२ जानेवारी, २०२०

वाचा: - १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:-आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६ (भाग-१) /आव्यप्र-१ दिनांक :-८.८.२०१७

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:-आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६ (भाग-१) /आव्यप्र-१ दिनांक :-२८.१२.२०१८

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६ (भाग-१) /आव्यप्र-१, दिनांक १६.१.२०२०.

**शासन निर्णय :-**

या विभागाचा अनुक्रमांक-३ येथील समक्रमांकाचा दिनांक १६.१.२०२० चा शासन निर्णय अधिक्रमित करून रायगड जिल्ह्यातील पूर, दरड, भूकंप धोके सौम्यिकरण उपायायोजनेंतर्गत पदथर्शी प्रकल्पांतर्गत ६ रचनात्मक कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून त्यासाठी एकूण रु. २,११,५४,७४५/- (रु.दोन कोटी अकरा लाख चोपन्न हजार सातशे पंचेचाळीस फक्त) एवढा निधी संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. त्यानूसार सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरिता अर्थसंकल्पीय अनुदानातून रक्कम रु. १५०.०० लक्ष इतका निधी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये रायगड जिल्ह्यास उपलब्ध करुन देण्यात आला होता. त्यापैकी रु. १,४९,०७,३५०/- (रुपये एक कोटी एकोणपन्नास लाख सात हजार तीनशे पन्नास फक्त) इतका निधी खर्च झाला असून त्याबाबतचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे व उर्वरित रक्कम रु.९२,६५०/- (रुपये ब्यान्नव हजार सहाशे पन्नास) समर्पित करण्यात आलेली आहे. एकूण मंजूर ६ कामांपैकी ३ कामे पुर्ण झाली असून, उर्वरित राहिलेली खालील ३ कामे पुर्ण करण्यासाठी रु. ६२,४७,३९५/- (रुपये बासष्ट लाख सत्तेचाळीस हजार तीनशे पंच्यान्नव फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **रक्कम रु.** |
|---|---|---|
| १ | मौजे लोअर तुडील येथील अंजुमन हायस्कुलसाठी दरडी प्रतिबंधक संरक्षक भिंत बांधणे | ३०,१२,३०५/- |
| २ | मौजे जुई येथे दरडी प्रतिबंधक उपाय योजनांतर्गत संरक्षक भिंत बांधणे | २७,८६,८८४/- |
| ३ | मौजे महाड साईलनगर येथे कॉंक्रीट रस्त्याचे बांधकाम करणे | ४,४८,२०६/- |
| | **एकूण रक्कम रुपये** | **६२,४७,३९५/-** |

कार्यासन अधिकारी, (म-११) यांनी सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा.

वितरीत करण्यात आलेला निधी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात खर्च करुन त्याबाबतचे उपयोगीता प्रमाणपत्र दिनांक ३१.०३.२०२० पर्यंत शासनास सादर करण्यात यावे.

या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ , नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१)(०१) शोध, बचाव कार्य व लोकांना सुरक्षित स्थळी हलविण्यासाठी आपत्तीच्या प्रतिसादासाठी (संपर्कसाधनासह ) खरेदी करावयाची साधनसामुग्री (आपत्ती प्रतिसाद निधीच्या ५ टक्के मर्यादेपर्यंत) २२४५ २४९९ अंतर्गत ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षासाठी पुनर्विनियोजनाने करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२००१२३११३५०८७४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIRANG SHRIPATI GHOLAP

Digitally signed by SHRIRANG SHRIPATI GHOLAP
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9a2bc3b45be4b89f7c46c4474cf90b8a3c477e34c064494b04238ca50ee43db6, postalCode=400032, street=1ST FLOOR MAIN ROAD, MANTRALAYA, ou=REVENUE AND FOREST DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHRIRANG SHRIPATI GHOLAP
Date: 2020.01.23 11:41:36 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. जिल्हाधिकारी, रायगड

२. महालेखापाल ,महाराष्ट्र -१, मुंबई.

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४. वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई ३२

५. कक्ष अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई-३२.

६. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आव्यप्र-६, मंत्रालय, मुंबई.

७. निवडनस्ती.